संरक्षण दलातील अविवाहित शहिद झालेल्या सैनिकांच्या नामनिर्देशित मालमत्तांना मालमत्ता करातून सूट देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.५९/नवि-२०,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांकः- ०९ जानेवारी, २०१७.

**वाचा :-** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांकः- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.५९/नवि-२०, दि. ०५.०४.२०१६
२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांकः- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.५९/नवि-२०, दि. ०७.०४.२०१६

**प्रस्तावनाः-**

शासन निर्णय, नगर विकास विभाग, दि.०७.०४.२०१६ अन्वये नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे क्षेत्रात राहणाऱ्या, देशासाठी प्राणाची बाजी लावून, जिवाची पर्वा न करता नि:स्वार्थीपणे देशाचे संरक्षण करताना बजावण्यात आलेल्या उत्कृष्ट कामगिरीकरीता संरक्षण दलातील शौर्य पदक धारक आणि माजी सैनिकांच्या विधवांना त्यांच्या नावावर असलेल्या मालमत्तेच्या करातून सूट देण्याचा निर्णय घेतला आहे. नागरी स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रातील अविवाहित शहिद सैनिकांच्या नामनिर्देशित मालमत्तांवरील कर माफ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३९ अन्वये बृहन्मुंबई महानगरपालिका, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२७ अन्वये महानगरपालिका व महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम १०५ अन्वये नगरपरिषदा, नगरपंचायती मालमत्ता कराची आकारणी करतात. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रात राहणाऱ्या जे सैनिक अविवाहित आहेत व ते देशाचे संरक्षण करतांना शहिद झाले आहेत अशा अविवाहित शहिद झालेल्या सैनिकांच्या नामनिर्देशित मालमत्तांना मालमत्ता करात सूट देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१७०१०९१५५३३९२३२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.01.10 17:05:43 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्माननीय विधानसभा/ विधानपरिषद व संसद सदस्य

३) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा. लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
९) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
१०) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
११) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१२) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायत (सर्व)
१३) नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
१४) निवडनस्ती.